**उप संचालक (माहिती), गट-अ (वरिष्ठ) या संवर्गात तात्पुरती पदोन्नती देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन आदेश क्रमांकः मावज-२०२४ / प्र.क्र.७६ / मावज-२ (३४-अ),**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई -४०० ०३२.
दिनांक : २२ एप्रिल, २०२५.

**शासन आदेश :-**

माहिती व जनसंपर्क महासंचालनालयातील वरिष्ठ सहायक संचालक (माहिती) / जिल्हा माहिती अधिकारी / वरिष्ठ उपसंपादक / जनसंपर्क अधिकारी, गट अ (कनिष्ठ) (वेतन श्रेणी एस- २० : ५६१००-१७७५००) या पदावरुन उप संचालक (माहिती) गट-अ (वरिष्ठ) (वेतन श्रेणी एस-२३ : ६७७००-२०८७००) या पदावर सन २०२४-२०२५ निवडसूची वर्षात खालील अटींच्या अधीन राहून तात्पुरती पदोन्नती देण्यात येत असून त्यांची पदोन्नतीनंतर रकाना (४) येथे त्यांच्या नावापुढे दर्शविलेल्या पदावर पदस्थापना करण्यात येत आहे.

**अ) पदोन्नतीच्या कोटयातील ४ रिक्त पदांवर द्यावयाच्या तात्पुरत्या स्वरुपात पदोन्नतीचे विवरणपत्र :-**

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | सध्याचे कार्यरत पद | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण |
|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ३ | ४ |
| १ | श्री. र. बा. गिते | भ.ज. (ड) | जिल्हा माहिती अधिकारी, वर्धा | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोकण, नवी मुंबई |
| २ | देवेंद्र लक्ष्मण पाटील | इ.मा.व. | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), मुख्यालय, मुंबई | उपसंचालक (माहिती), प्रपत्र बढती मा. उप मुख्यमंत्री कार्यालय (वित्त व नियोजन), मंत्रालय, मुंबई. |
| ३ | श्रीमती मीनल शशिकांत जोगळेकर | खुला | प्रतिनियुक्तीने प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई. | उपसंचालक (माहिती), प्रपत्र बढती प्रकल्प संचालक, पु.ल. देशपांडे महाराष्ट्र कला अकादमी, मुंबई. |
| ४ | श्री. प्रविण टाके | इ.मा.व. | जिल्हा माहिती अधिकारी, नांदेड | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, कोल्हापूर. |

**ब) सरळसेवेच्या कोटयातील २ रिक्त पदावर व प्रतिनियुक्तीने गेलेल्या १ रिक्त पदावर द्यावयाच्या तदर्थ पदोन्नतीचे विवरणपत्र :-**

| अ. क्र. | अधिकाऱ्याचे नाव | प्रवर्ग | सध्याचे कार्यरत पद | पदोन्नतीने पदस्थापनेचे ठिकाण | पदोन्नतीचा प्रकार |
|---|---|---|---|---|---|
| १ | २ | ३ | ३ | ४ | ५ |
| १ | श्रीमती किर्ती प्र. मोहरील पांडे | खुला | जनसंपर्क अधिकारी, मा. मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई. | उपसंचालक (माहिती), प्रपत्र बढती मा.मुख्यमंत्री कार्यालय, मंत्रालय, मुंबई. | तदर्थ पदोन्नती |
| २ | श्रीमती वर्षा संतोष आंधळे | खुला | वरिष्ठ सहायक संचालक (माहिती), मुख्यालय, मुंबई | उपसंचालक (माहिती), (वृत्त), मुख्यालय, मुंबई. | तदर्थ पदोन्नती |
| ३ | श्री. किरण जनार्दन मोघे | खुला | जिल्हा माहिती अधिकारी, अहिल्यानगर | उपसंचालक (माहिती), विभागीय माहिती कार्यालय, पुणे | प्रतिनियुक्तीमुळे रिक्त झालेल्या पदावर तदर्थ पदोन्नती |

२. श्री. देवेंद्र लक्ष्मण पाटील, श्रीमती मीनल शशिकांत जोगळेकर व श्रीमती किर्ती प्र. मोहरील पांडे यांनी महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेत्तर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील निमय ४०, परिशिष्ट -२, अट क्र. १८ नुसार तात्पुरत्या स्वरुपात प्रपत्र बढती (पदोन्नती) देण्यात येत आहे. सदर तरतुदीनुसार प्रपत्र बढतीचा कालावधी हा आदेशाच्या दिनांकापासून ६ महिन्यांचा राहिल. त्यानंतर अधिकाऱ्यांनी मूळ विभागात हजर होणे आवश्यक राहिल.

तसेच, श्री. किरण ज. मोघे यांना उपसंचालक (माहिती), विभागीय कार्यालय, नाशिक या कार्यालयाचा अतिरिक्त कार्यभार देण्यात येत आहे.

३. उक्त अधिकारी यांना उप संचालक (माहिती) या पदावरील तात्पुरती तसेच तदर्थ पदोन्नती खालील अटींच्या अधीन राहून देण्यात येत आहे :-

<u>अटी व शर्ती :-</u>

(१) सदरची तात्पुरती तसेच तदर्थ पदोन्नती देताना निवडसूचीतील कोणीही ज्येष्ठ अधिकारी अनावधानाने वगळण्यात आलेले नाहीत अथवा अधिक्रमित झालेले नाहीत.

(२) सदरची पदोन्नती देताना मा. सर्वोच्च न्यायालय, नवी दिल्ली येथे राज्य शासनाने दाखल केलेल्या विशेष अनुज्ञा याचिका क्र.२८३०६/२०१७ च्या अधिन राहून पदोन्नतीच्या कोट्यातील सर्व रिक्त पदे दि.२५.५.२००४ स्थित सेवाजेष्ठतेनुसार निव्वळ तात्पुरत्या स्वरुपात भरण्याबाबत सा.प्र.वि. / १६-ब कार्यासनाच्या दि. ७.५.२०२१ च्या शासन निर्णयानुसार दिलेल्या सूचनांनुसार मान्यता देण्यात येत आहे. तसेच, दि. ७ मे, २०२१ च्या शासन निर्णयाप्रकरणी मा. उच्च न्यायालय, मुंबई येथे आव्हान देण्यात आलेले असून, त्यावरील अंतिम निर्णयाच्या अधीन राहून, सदर सहमती देण्यात येत आहे.

(३) गोपनीय अभिलेखाच्या आधारे सदर अधिकाऱ्यांचे अधिक्रमण प्रस्ताविलेले नाही. सदर अधिकाऱ्यांविरुध्द विभागीय चौकशी प्रस्तावित अथवा प्रलंबित नाही.

(४) सदरची तात्पुरती तसेच तदर्थ पदोन्नती अत्यंत तात्पुरत्या स्वरुपात प्रशासकीय निकड म्हणून लोकहितास्तव देण्यात आली आहे. या तात्पुरत्या तसेच तदर्थ पदोन्नतीमुळे संबंधित अधिकाऱ्यांना नियमित पदोन्नतीचे म्हणजेच ज्येष्ठतेचे कोणतेही हक्क प्राप्त होणार नाहीत.

(५) सरळसेवेच्या कोट्यातील व प्रतिनियुक्तीने रिक्त झालेल्या पदावर देण्यात आलेली तदर्थ पदोन्नती ही ११ महिने किंवा प्रतिनियुक्तीवरील उमेदवार परत येतील किंवा सरळसेवेच्या कोट्यातील उमेदवार येतील यापैकी जे आधी घडेल तो पर्यंत राहिल. दरम्यानच्या काळात सरळसेवेच्या कोट्यातील उमेदवारास नियुक्ती दिल्यास तदर्थ पदोन्नती झालेल्या अधिकाऱ्यास पदावनत करण्यात येईल. सदर तदर्थ पदोन्नती तात्पुरत्या स्वरुपात असून सदर पदावर संबंधित अधिकाऱ्याचा कायमस्वरुपी धारणाधिकार राहणार नाही.

३. वरील अधिकारी यांनी इतर कोणत्याही आदेशांची वाट न पाहता त्यांच्या नवीन नियुक्तीच्या ठिकाणी तात्काळ रुजू होण्यासाठी कार्यमुक्त करण्यात यावे. तसेच त्यांनी नवीन पदाचा कार्यभार स्वीकारल्यानंतर त्याबाबतचा अहवाल शासनास विनाविलंब सादर करावा.

४. वरील तात्पुरत्या पदोन्नती मिळालेल्या अधिकाऱ्यांनी पदोन्नतीचे पद ग्रहण केल्यापासून १ महिन्याच्या आत वेतननिश्चितीचा विकल्प द्यावा. असा विकल्प विहित मुदतीत न दिल्यास त्यांची वेतननिश्चिती महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम क्र. ११ (१) (ए) अनुसार पदोन्नतीचा दिनांक विचारात घेऊन करण्यात यावी.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक क्रमांक २०२५०४२२११२७२७८२०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR

Digitally signed by YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=GENERAL ADMINISTRATION DEPARTMENT, 2.5.4.20=f7ccdb18d954bb814d3cc3c92ab0c128e19f5f95c724abaf0a38fa1a74dec734, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=1A45294B68B97E03C570AFA8F17C64F6DFE2A4A241DD2AFF2322FEEC22B389F5, cn=YUVRAJ MANOHAR SOREGAONKAR
Date: 2025.04.22 11:28:39 +05'30'

**( युवराज सोरेगांवकर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. मुख्यमंत्र्यांचे अपर मुख्य सचिव तथा अपर मुख्य सचिव (सांस्कृतिक कार्य विभाग), मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
२) मा. मुख्यमंत्र्यांचे प्रधान सचिव, मा.मुख्यमंत्री सचिवालय, मंत्रालय, मुंबई,
३) प्रधान सचिव (मावज), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
४) महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
५) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर,
६) महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व परिक्षा), मुंबई / नागपूर,
७) संचालक (माहिती) (प्रशासन), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
८) संचालक (माहिती) (वृत्त व जनसंपर्क), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
९) संचालक (माहिती), नागपूर-अमरावती विभाग, नागपूर,
१०) संचालक (माहिती), मराठवाडा विभाग, छत्रपती संभाजीनगर,

११) सर्व उप संचालक (माहिती),
१२) उप संचालक (लेखा), माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१३) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
१४) जिल्हा कोषागार अधिकारी, मुंबई / वर्धा / नवी मुंबई /नांदेड / कोल्हापूर /अहिल्यानगर,
१५) आहरण व संवितरण अधिकारी, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई,
१६) संबंधित अधिकारी (मावज मार्फत),
१७) निवडनस्ती (मावज-२).